सा.बां. विभाग

**पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर यांच्या स्मरणार्थ राज्यस्तरावर सांस्कृतिक सभागृह बांधणेस प्रशासकीय मान्यता**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः विकास-२०१८/प्र.क्र.२५३/यो-६**
बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई-४०० ००१.
**दिनांक: ०७ जानेवारी, २०१९.**

वाचा:-

१) **शासन निर्णय क्रमांकः ग्रा.वि.व.ज.सं.वि.क्र.झेडपीए-२०१५/प्र.क्र-१०/वित्त-९, दि. २५/०३/२०१५.**
२) **शासन निर्णय क्रमांकः ग्रा.वि.व.ज.सं.वि.क्र.विकास- २०१५/प्र.क्र.५२/यो-६, दि. २७/०३/२०१५.**
३) **शासन निर्णय क्रमांकः ग्रा.वि.व.ज.सं.वि.क्र.विकास- २०१५/प्र.क्र.२७४/यो-६, दि. १६/१२/२०१५.**
४) **शासन परित्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं २०१८/प्र.क्र.६९/अर्थ ३ ,दि.०२/०४/२०१८.**
५) **नियोजन विभागाचे अ.शा.पत्र क्र.संकीर्ण-२०१८/प्र.क्र.२७/का.१४११,दि.२९ जून, २०१८.**

प्रस्तावना :-

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात "लोकप्रतिनिधींनी सुचविलेल्या गावांतर्गत मुलभूत सुविधा (लेखाशीर्ष २५१५ १२३८)" या योजनेंतर्गत जुलै, २०१८ च्या पावसाळी अधिवेशनात रु.१०००.०० कोटी इतकी पूरक मागणी मंजूर करण्यात आली होती. त्यापैंकी रु.४०.०० कोटी इतका निधी पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर यांच्या स्मरणार्थ सभागृह बांधकामासाठी राखून ठेवण्याचे नियोजन विभागाचे संदर्भिय पत्र क्र.५ अन्वये निदेश होते.

२. दि.२६/१०/२०१८ रोजी मा.मंत्री (वित्त) यांच्या समवेत झालेल्या बैठकीत मा.मंत्री महोदयांनी तसेच वित्त व नियोजन विभागाने मंजूर पुरक मागणी रू.१०००.०० कोटी पैकी रू.४०.०० कोटी उपरोक्त सभागृहांसाठी राखीव ठेवण्यात आलेला असल्यामुळे, या अनुदानातून केवळ संबंधित सभागृहाचेच काम व्हावे व इतर कोणतेही कामे मंजूर न करता प्रशासकीय आदेश तात्काळ निर्गमित करण्याचे निर्देशीत केले.

३. सदर प्रकरणी मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांच्याकडून सभागृह बांधणेकरिता खर्चाचे अंदाजपत्रक तयार करण्यात आले असून, एका सभागृहाच्या बांधकामासाठी रु.६२,५३,४००/- इतक्या रक्कमेचे अंदाजपत्रक सादर करण्यात आले आहे. सदर सभागृहाचे क्षेत्रफळ हे १२५ चौ.मीटर इतके असावे व त्यानुसार बांधकामाचा खर्च, विद्युतीकरण, वॉटर हार्वेस्टिंग, पाणीपुरवठा, आकस्मिक निधी, संरक्षक भिंती, प्रवेशव्दार, अंतर्गत रस्ते, सौर पथदिवे व पाण्याचे पंप यांच्या वापरामध्ये उपयोग, माती परिक्षण, जमीनीचे सर्वेक्षण व सेंटेस शुल्क इ. बाबींचा सदर अंदाजपत्रकात समावेश केला आहे. याबाबत मा. मंत्री (वित्त, नियोजन व वने) यांच्या निर्देशानुसार व मा. संसद सदस्य डॉ.विकास महात्मे यांच्या संकल्पनेनुसार १२८ गावांची नांवे प्रस्तावित करण्यात आली होती. तथापि, या पैकी ५८ गांवे ग्रामीण भागांतील असून उर्वरित गांवे शहरी भागांतील आहेत. दि.२६.१०.२०१८ रोजी झालेल्या बैठकीनुसार ज्या गावांत ४००० चौ.मी. वा त्यापेक्षा जास्त ग्रामपंचायत/शासकीय जागा असेल त्या जागेवरच उपरोक्त सभागृह बांधण्यात यावे, असे निर्देशित करण्यात आले.

४. सबब, आतापर्यंत प्राप्त माहिती नुसार ग्रामीण भागातील ५८ गांवांपैकी ३६ गावांकडे ४००० चौ.मी पेक्षा जास्त ग्रामपंचायत/शासकीय जागा उपलब्ध आहे. त्यानुसार सदर जागांवर पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर यांचे स्मरणार्थ सामाजिक सभागृह बांधण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

उपरोक्त प्रस्तावनेमध्ये नमूद असल्याप्रमाणे सोबत जोडलेल्या यादीप्रमाणे ३६ गांवांमध्ये पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर यांच्या नांवाने सभागृह बांधण्यास व यासाठी होणारा खर्च रू.६२,५३,४००/- प्रति सभागृह प्रमाणे, एकूण रू. २२,५१,२२,४००/-(रूपये बावीस कोटी, एक्कावन लाख,बावीस हजार, चारशे फक्त-) एवढ्या खर्चास खालील अटीं व शर्ती च्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. अ) काम सुरु करणेपूर्वी जागेची खात्री करावी. ब) काम सुरु करण्यापूर्वी, सदर अंदाजपत्रक संबंधित मंडळाचे सार्वजनिक बांधकाम विभागाचे अधिक्षक अभियंता व उपभोक्त्या विभागाचे सक्षम अधिकारी यांच्याकडून साक्षांकित करुन घ्यावे. क) काम सुरु करण्यापूर्वी मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास शासकीय वास्तूविशारदांकडून मंजूरी घेऊनच काम सुरु करावे. ड) उपरोक्त वास्तुसंबंधी अथवा कोणत्याही तांत्रिक मुद्द्यासंबंधातील कोणत्याही बाबीमध्ये शंका/अडचण उद्भवल्यास ग्रामविकास विभागास व सा.बां. विभागास विनाविलंब संपर्क साधावा.

२. यासाठी मंजूर रक्कम प्रस्तावनेत नमूद सभागृहाच्या संबंधित कामाकरिता खर्च करण्यासाठी संबंधित कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांचेकडे सुपूर्द करण्यात यावी. तसेच **ज्या कामासाठी अनुदान मंजुर झाले आहे त्याच कामावर खर्च करणे बंधनकारक राहील**.

३. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या सर्व कामांसाठी प्रचलित कार्यपध्दतीनुसार प्रशासकीय व तांत्रिक मंजूरी,निविदा काढणे/स्वीकरणे इत्यादी बाबतची कार्यवाही सक्षम प्राधिकाऱ्याकडून करुन घेण्याची जबाबदारी **संबंधित अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ** यांची राहील. तसेच सदरील कामे मंजूर अनुदानाच्या मर्यादेतच पूर्ण होतील, याची दक्षता घेण्यात यावी. मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्चाच्या कामांना प्रशासकीय मान्यता दिल्यास, त्यासाठी कुठल्याही स्वरुपात अतिरीक्त अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

४. सदरील कामे हाती घेण्यापूर्वी संबंधित क्षेत्रात जिल्हा परिषद, पंचायत समिती व ग्रामपंचायतीच्या सार्वत्रिक निवडणूका / पोट निवडणूकांसाठी आचारसंहिता अंमलात नाही, याबाबत संबंधित अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ यांनी खात्री करावी.

५. सर्व कामांच्या पूर्णत्वाचे दाखले व उपयोगिता प्रमाणपत्र संबंधित अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ यांनी महालेखापाल, संबंधित विभागीय आयुक्त व शासनास पाठवावेत.

६. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेला निधी वित्तीय वर्षा अखेरीस खर्च झाला नाही तर अखर्चित निधी शासन कोषागारात जमा करुन चलनाची प्रत महालेखापाल मुंबई व शासनास पाठविण्यात यावी.

७. वरील बाबींवर होणारा खर्च मागणी क्र. एल-३ मुख्य लेखाशिर्ष-२५१५-इतर ग्राम विकास कार्यक्रम-८००-इतर खर्च (०१) (०८) ग्रामीण भागातील विकास कामासाठी जिल्हा परिषदांना सहायक अनुदान (योजनांतर्गत ) दत्तमत (२५१५-१२३८), २७ लहान बांधकामे (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या चालू वित्तीय वर्षातील तरतूदीतून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

८. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं २०१८/प्र.क्र.६९/अर्थ ३ , दि.०२/०४/२०१८ मधील मुद्दा क्र.६ (क), नुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१०७१४५३१३६५२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MANOJ DATTATARY JADHAV

Digitally signed by MANOJ DATTATARY JADHAV
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=a83fc829949e9b1a022b031436c946028b48d51f5a1bf36ca3ce4fead857da72, postalCode=400001, street=BHANDHKAM BHAVAN,25 MARZBAN PATH,FORT,MUMBAI, serialNumber=2766afda86350272237dcf9a191545970f7f12e66d0605c664ca2bf0f3001dc0, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=MANOJ DATTATARY JADHAV
Date: 2019.01.16 18:33:27 +05'30'

**(मनोज जाधव)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य,मुंबई.

२) मा.मुख्यमंत्री,महाराष्ट्र राज्य, मंत्रालय,मुंबई.

३) मा.मंत्री,वित्त मंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई-०३२

४) मा.मंत्री, ग्रा.वि.यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

५) मा.राज्यमंत्री, ग्रा.वि.यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

६) मा.अप्पर मुख्य सचिव,वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

७) मा.अप्पर मुख्य सचिव,नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

८) मा.प्रधान सचिव,ग्रा.वि.यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई-३२

९) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता,१/२ , महाराष्ट्र, मुंबई.

१०) महालेखापाल, लेखा व परिक्षा, १/२, महाराष्ट्र, मुंबई.

११) अधिक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ, **यादीप्रमाणे.**

१२) कार्यासन क्र. वित्त-१/ वित्त-७, ग्रामविकास व पंचायत राज विभाग.

१३) निवड नस्ती, कार्यासन- योजना-६

***** पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर सभागृहा करिता प्रस्तावित ग्रामिण गावांची यादी*****

| अ.क्र. | गावाचे नाव | तालुका | जिल्हा |
|---|---|---|---|
| १ | सेलूबाजार | मंगरूळपीर | **वाशिम** |
| २ | वेहेरगाप फाटा | साक्री | **धुळे** |
| ३ | कुसुंबा | धुळे | |
| ४ | जुनासुर्ला | मुल | **चंद्रपूर** |
| ५ | खेडी | सावली | |
| ६ | मादन | चांदूरबाजार | **अमरावती** |
| ७ | हिवरा | अचलपूर | |
| ८ | पुसदा | अमरावती | |
| ९ | रोहा | मोहाडी | **भंडारा** |
| १० | चिचाळ | पवनी | |
| ११ | जैतपूर बारव्हा | लाखांदूर | |
| १२ | सिलेगाव | तुमसर | |
| १३ | आरेवाडी | कवठेमहांकाळ | **सांगली** |
| १४ | वाळवा | इस्लामपूर | |
| १५ | देवधाबा | मलकापूर | **बुलढाणा** |
| १६ | कारवाडी | हिंगोली | **हिंगोली** |
| १७ | पिंपळगाव बाळापुर | पूर्णा | **परभणी** |
| १८ | चिंचोली काळे | जिंतूर | |
| १९ | महात पुरी | गंगाखेड | |
| २० | झरी | परभणी | |
| २१ | कळगाव | पूर्णा | |

| | | | |
|---|---|---|---|
| २२ | आसेगाव | गंगापूर | **औरंगाबाद** |
| २३ | लोहगड नांद्रा | फुलंब्री | |
| २४ | चोरखडी | कळंब | **उस्मानाबाद** |
| २५ | यमगरवाडी | तुळजापूर | |
| २६ | ढोरखेडा | मालेगाव | **वाशिम** |
| २७ | बेलोरा | पुसद | **यवतमाळ** |
| २८ | माळेगांव | लोहा | **नांदेड** |
| २९ | रिसनगांव | लोहा | |
| ३० | शेळगांव (छत्री) | नायगांव (खै.) | |
| ३१ | वझरगा | देगलूर | |
| ३२ | हारवाडी | रेणापूर | **लातूर** |
| ३३ | हाणमंत जवळगा | चाकूर | |
| ३४ | मादलापूर | उदगीर | |
| ३५ | पुनोती बु. | बार्शीटाकळी | **अकोला** |
| ३६ | नाचणगांव | देवळी | **वर्धा** |